# होमिओपाथिक औषधांचा लक्षण-भावनाकोश

लेखक :
डॉ. शं. र. फाटक, एम्. बी. बी. एस्.




महाराष्ट्र राज्य
साहित्य संस्कृती मंडळ

पहिली आवृत्ती : १९६४
सुधारून वाढवलेली दुसरी आवृत्ती : १९७४
तिसरी आवृत्ती : १९८७


सचिव, महाराष्ट्र राज्य
साहित्य संस्कृती मंडळ,
मंत्रालय, मुंबई–४०००३२.

मुद्रक :–
श्री- केशवराव चौधरी,
निदेशक,
आंतर भारती मुद्रणालय,
४२, आंबेकर मार्ग,
वडाळा, मुंबई–४०००३१.

**किंमत : रू. ४०/–**

# निवेदन

होमिओपाथिक औषधांचा लक्षण भावना कोश हा ग्रंथ वाचकांच्या हाती सोपवितांना महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळास आनंद होत आहे.

मंत्रालय, मुंबई
दिनांक,
१ मे १९८७

डॉ. सुरेन्द्र बारलिंगे
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य
साहित्य संस्कृती मंडळ

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रात त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृति, इतिहास, कला इत्यादि विषयात मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा मुख्य उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृति मंडळाने वाङ्मय निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, वाङ्मयकोश, विज्ञान-माला, भाषांतरमाला, आंतरभारती-विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादि योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगल्भ स्वरूप व दर्जा येण्याकरिता मराठीत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्यावत् माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल, ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे. आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृति यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला पराव-लंबित्व रहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही. एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. वरील विषयांवर केवळ परिभाषाकोश अथवा पाठ्यपुस्तके प्रकाशित करून विद्यापीठीय स्तरावर अशाप्रकारचे स्वरूप व दर्जा मराठी भाषेला प्राप्त होणार नाही. सर्वसामान्य सुशिक्षितांपासून तो प्रज्ञावंत पंडितांपर्यंत मान्य होतील अशा ग्रंथांची रचना व्हावयास पाहिजे. मराठी भाषेत किंवा अन्य भारतीय भाषांमध्ये विज्ञान, सामाजिक शास्त्रे व तंत्रविज्ञान या विषयांचे प्रतिपादन करावयास उपयुक्त अशा परिभाषासूची किंवा परिभाषा कोश तयार होत आहेत. पश्चिमी भाषांना अशाप्रकारच्या कोशाची गरज नसते, याचे कारण उघड आहे. पश्चिमी भाषांत ज्या विद्यांचा संग्रह केलेला असतो, त्या विद्यांची परिभाषा सतत वापराने रूढ झालेली असते. त्या शब्दांचे अर्थ त्यांच्या उच्चाराबरोबर वा वाचनाबरोबर वाचकांच्या

लक्षात येतात, निदान त्या त्या विषयांतील जिज्ञासूंना तरी ते माहीत असतात. अशी स्थिती मराठी किंवा अन्य भारतीय भाषांची नाही. परिभाषा किंवा शब्द यांचा प्रतिपादनाच्या ओघात समर्पकपणे वारंवार प्रतिष्ठित लेखांत व ग्रंथांत उपयोग केल्याने अर्थ व्यक्त करण्याची त्यात शक्ती येते. अशातऱ्हेने उपयोगात न आलेले शब्द केवळ कोशात पडून राहिल्याने अर्थशून्य राहतात. म्हणून मराठीला आधुनिक ज्ञानविज्ञानांची भाषा बनविण्याकरिता शासन, विद्यापीठे, प्रकाशनसंस्था व त्या त्या विषयांचे कुशल लेखक यांनी मराठीत ग्रंथरचना करणे आवश्यक आहे.

४. वरील उद्देश ध्यानात ठेवून मंडळाने जो बहुविध वाङ्मयीन कार्यक्रम आखला आहे त्यातील पहिली पायरी म्हणून सामान्य सुशिक्षित वाचकवर्गाकरिता, इंग्रजी न येणाऱ्या कुशल कामगारांकरिता व पदवी / पदविका घेतलेल्या अभियंत्यांकरिता सुबोध भाषेत लिहिलेली विज्ञान व तंत्रविषयक पुस्तके प्रकाशित करून स्वल्प किंमतीत देण्याची व्यवस्था केलेली आहे. मंडळाने आजवर आरोग्यशास्त्र, शरीरविज्ञान, जीवशास्त्र, आयुर्वेद, गणित, ज्योतिषशास्त्र, भौतिकी, रेडिओ, अणुविज्ञान, सांख्यिकी, स्थापत्यशास्त्र, वनस्पतिशास्त्र, इत्यादि विषयांवर २८ दर्जेदार पुस्तके विज्ञानमालेत प्रकाशित केली आहेत. वस्त्रोद्योग, प्रकाशचित्रणकला, गणकयंत्रे, रंग, कृत्रिम धागे, चर्मोद्योग, पुस्तक–बांधणी, मोटार–दुरुस्ती, वैमानिक विद्या, अवकाशयान, साखर-निर्मिती इत्यादी इतर अनेक विषयांवरील पुस्तके तयार होत आहेत.

५. या विज्ञानमालेत डॉ. शं. र. फाटक, मुंबई यांनी लिहिलेल्या "होमिओपाथिक औषधांचा लक्षण–भावनाकोश" या ग्रंथाची पहिली आवृत्ती मंडळाने १९६४ मध्ये प्रकाशित केली होती. पहिल्या आवृत्तीच्या सर्व प्रती संपल्या आणि सदर ग्रंथाच्या उपयुक्ततेबाबत मराठी वाचकांकडून प्रशंसायुक्त व अधिक मागणी करणारी अशी अनेक पत्रे मंडळाकडे आली व येत आहेत. म्हणून या ग्रंथाच्या द्वितीयावृत्तीचे प्रकाशन आवश्यक झाले. ही सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ती मराठी वाचकांच्या हाती देताना आनंद होत आहे.

६. आधुनिक वैद्यकशास्त्र, औषधीविज्ञान व चिकित्सापद्धती यांवर मराठी भाषेत उल्लेखनीय ग्रंथांचा अभाव आहे. पाश्चात्य औषधीविज्ञान व चिकित्सापद्धती आज बरीच प्रगत अवस्थेत आहे व या विषयांवरील ग्रंथ बहुतांश इंग्रजी भाषेतच भारतीय वाचकास उपलब्ध आहेत. भारतीय औषधी–विज्ञान व वैद्यकशास्त्राला आयुर्वेदाचे पाठबळ असले तरी आधुनिक चिकित्सेत पाश्चात्य औषधीविज्ञानाचाच प्रामुख्याने अवलंब केला जात आहे. तसेच, भारतीय विद्यापीठां-

मध्येही या विषयावर इंग्रजी माध्यमातूनच शिक्षण दिले जात आहे. आधुनिक ज्ञान-विज्ञानाच्या सर्व क्षेत्रात मराठी भाषेला समर्थपणे संचार करता यावा म्हणून तिच्या विकासाची जी योजना मंडळाने हाती घेतली आहे त्या योजनेमध्ये मराठी भाषेत आयुर्वेद, पाश्चात्य औषधीविज्ञान व चिकित्सापद्धती आणि वैद्यकशास्त्र या विषयांवरील पुस्तकांच्या प्रकाशनाचा समावेश आहे. या विषयावर मंडळाने "होमिओपाथिक लक्षणांचा भावनाकोश" "मानवी अनुवंशिकता", "आरोग्य आणि आहारशास्त्र", "माणसाचा मेंदू आणि त्याचे कार्य", आयुर्वेदीय शब्दकोश, भाग १ व २", "मधुमेह", "मानवी देह' भाग १ व २", डॉ. बोमां यांचे "Medicine : Essencials for practitioners & Students" या पुस्तकाचा मराठी अनुवाद "पाश्चात्य रोग चिकित्सा" अशी ११ दर्जेदार पुस्तके आतापर्यंत प्रकाशित केली आहेत. "मानवी शरीर विज्ञान", "स्त्री-रोग-चिकित्सा" (डॉ. मसानी यांच्या "A Text Book of Gynaecology" चा अनुवाद) "प्रसूतिशास्त्र (डॉ. मसानी यांच्या "A Text-Book of Obstetries" चा अनुवाद), "प्राणिजन्य मानवी रोग" इत्यादी ग्रंथ क्रमाने प्रकाशित होत आहेत.

७. पहिल्या आवृत्तीप्रमाणेच "होमिओपाथिक औषधांचा लक्षण-भावनाकोश" या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीचेही वैद्यकशास्त्रासंबंधी जिज्ञासा असलेल्या लोकांकडून स्वागत होईल अशी आशा आहे. ग्रंथलेखक डॉ. फाटक यांनी मंडळाच्या सूचनेनुसार या ग्रंथाच्या सुधारून वाढविलेल्या द्वितीयावृत्तीची मुद्रणप्रत सत्वर मंडळास उपलब्ध करून दिली याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. याच विषयावरील डॉ. फाटक यांनी लिहिलेल्या "होमिओपाथिक औषधांचा निघंटु" या ग्रंथाची द्वितीयावृत्ती मंडळाने नुकतीच प्रकाशित केली आहे.

**वाई :**
नारळी पौर्णिमा,
११ श्रावण १८९६
२ ऑगस्ट, १९७४.

**लक्ष्मणशास्त्री जोशी,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ.

# पुरस्कार

महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाने पश्चिमी देशातील ज्ञान--विज्ञानाचे मराठी भाषेत संकलन करण्याचा संकल्प केला आहे. होमिओपाथी हा पश्चिमी वैद्यकाचा एक प्रकार आहे. वैज्ञानिक दृष्ट्या होमिओपाथीचे मूल्यमापन करीत असतांना मतभेद होणे पुष्कळ संभवनीय आहे. परंतु एक समाजात प्रचलित असलेली रोगनिवारण पद्धति आहे. मराठीमध्ये या विषयावर काही थोडी पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत.

आम्ही या विषयावर प्रमाणभूत असे दोन ग्रंथ प्रसिद्ध करण्याचे योजिले होते. त्यांपैकी गतवर्षाच्या अखेरीस होमिओपाथिक औषधांचा निघण्टु हा डॉ. शं. र. फाटक यांनी लिहिलेला ४२४ पृष्ठांचा ग्रंथ आम्ही प्रसिद्ध केला. आता होमिओपाथिक लक्षण भावना कोश हा याच विषयावरील डॉ. फाटक यांनी लिहिलेला दुसरा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा सुयोग प्राप्त झाला आहे. पहिल्या ग्रंथाप्रमाणेच हा दुसरा ग्रंथही वैद्यकासंबंधी जिज्ञासा असलेल्या लोकांना अत्यंत संग्राह्य वाटेल असा आम्हास विश्वास वाटतो.

लक्ष्मणशास्त्री जोशी

ऑक्टोबर, १९६४.

अध्यक्ष,

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

## दुसऱ्या आवृत्तीची

# प्रस्तावना

कोषाच्या कंपोजिंगचे काम अगोदरच किचकट, त्यात अनेक लक्षणांची व त्याना दिलेल्या औषधांची नव्या आवृत्तीत भर पडलेली; असे असून सुद्धा प्राज्ञ प्रेसच्या कामगार बंधूंनी व श्री. पां. गो. आपटे यानी शक्य तितक्या सुरळीतपणे काम पार पाडले, याबद्दल या सर्वांचे आभार मानणे आवश्यक आहे.

मुंबई
जुलै १९७४

शं. र. फाटक

## पहिल्या आवृत्तीची

# प्रस्तावना

होमिओपाथिक चिकित्सा म्हणजे समोपचारपद्धतीची औषधपद्धती महाराष्ट्रात हल्ली बरीच वर्षे चालू आहे. परंतु काही थोड्या अनुभव आलेल्या माणसां-शिवाय इतरांना होमिओपाथी हे थोतांड वाटत असे. पूर्वीच्या मानाने आज या चिकित्सेकडे पहाण्याची दृष्टि बदलत चाललेली आहे. याला अनेक कारणे आहेत. सर्व उपाय थकल्यानंतर का होईना, पण बरेच लोक आता होमिओ-पाथीकडे वळताना दिसून येतात व अशा अनेक रोग्यांच्या बाबतीत ही चिकित्सा हितावह ठरते असाही लोकांना अनुभव येऊ लागला आहे. ३० वर्षापूर्वी ॲलोपाथिक (विषमोपचार) पद्धतीने बऱ्या न झालेल्या काहीं व्यथा होमिओ-पाथीने बऱ्या झालेल्या पाहून ग्रंथकर्त्याने होमिओपाथिक चिकित्सेकडे लक्ष दिले, व आलेल्या अनुभवामुळे विषमोपचार चिकित्सा सोडून समोपचार चिकित्सा करण्याचे सुरू केले. या ३० वर्षाच्या अनुभवाने त्याला आता खात्रीलायक सांगता येते की, समोपचारचिकित्सा ही टाकाऊ तर नाहीच, पण शस्त्रचिकित्सेच्या काही बाबी (ज्या खरोखर विषमोपचार चिकित्सेमध्ये येत नाहीत) सोडल्या तर विषमोपचार किंवा इतर चिकित्सांपेक्षा समोपचार चिकित्सा जास्त शास्त्रीय व उपयोगी आहे. दुर्दैवाने या चिकित्सेचे जाणकार फारच थोडे आहेत. जाहिरात-बाजी करून लोकांना फसविणारे, थोड्याशा माहितीने किंवा क्वचित् एखाद्या ठिकाणी आलेल्या यशाने, आपणास होमिओपाथीचे संपूर्ण ज्ञान झाले असे समजणारे चिकित्सक फार. शिवाय पूर्वग्रहदूषित असे अनेक ॲलोपाथिक डॉक्टर होमिओ-पाथीसंबंधाने काहीही माहिती नसता, ते काहीतरी ढोंग आहे असे दर्शवून रोग्यांची दिशाभूल करतात ती वेगळीच. परंतु हल्ली ही परिस्थिती हळूहळू पण खात्रीने बदलत चालल्याची सुचिन्हे दिसत आहेत. होमिओपाथीची उपयुक्तता, व तिच्या अभ्यासाची जरूरी लोकांना पटू लागली आहे व आता आपल्या पद्धतीने बरे न झालेले लोक दुसऱ्या कशानेही बरे होणार नाहीत असा आग्रह धरणारे काही हटवादी अपवाद सोडले तर ॲलोपाथिक उपचार करणाऱ्या अनेक पदवीधर डॉक्टरांनासुद्धा होमिओपाथीची उपयुक्तता पटून या चिकित्सेचा अभ्यास व तदनुसार उपचार करणे या गोष्टींकडे त्यांचे लक्ष दिवसेदिवस वाढत आहे. मग साधारण जनतेमध्ये या चिकित्सेसंबंधाने जास्त आस्था वाढली असली तर नवल नाही. अशा परिस्थितीत अभ्यासूंना उपयुक्त अशी पुस्तके

जितकी उपलब्ध होतील तेवढी पाहिजे आहेत, व स्वभाषेमध्ये अशी उपयुक्त पुस्तके असावी अशा उद्देशाने हे पुस्तक लिहिले आहे.

होमिओपाथीचा अभ्यास ज्यांनी केला आहे, व त्यासंबंधीच अनेक ग्रंथ पाहिले आहेत त्यांना या पद्धतीप्रमाणे औषधयोजना करण्यासाठी रेपर्टरी म्हणजे योजनाकोशाचा किती उपयोग होतो हे निराळे सांगण्याची जरूर नाही. परंतु ज्यांना याविषयी फारशी माहिती नाही. किंवा ज्यांना या पद्धतीची माहिती करून घ्यावयाची आहे त्यांच्यासाठी या प्रकारच्या कोशाबद्दल काही स्पष्टीकरण आरंभी करणे इष्ट वाटते.

रोग्याला कोणता रोग झाला आहे हे समजण्याचा मुख्य मार्ग म्हणजे त्याच्या शरीरात झालेला फरक; शरीराच्या नेहमीच्या कार्यात, इंद्रियांच्या व्यापारात किंवा त्यांच्या नेहमीच्या संवेदनात झालेला बदल, रोग्याला होणाऱ्या वेदना, आभास इत्यादि गोष्टींचे ज्ञान हाच होय. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन रोगाचे निदान करण्यात येते. व असे निदान केल्याशिवाय योग्य औषधाची योजना करता येत नाही असे विषमोपचार पद्धतीप्रमाणे मानण्यात येते व रोग कोणता याचे निदान नक्की झाल्याशिवाय औषधयोजना निरर्थक समजतात. नुसती लक्षणे समजून त्या लक्षणांप्रमाणे औषधयोजना करणे ॲलोपथीच्या शास्त्राला मान्य नाही असे सांगण्यात येते. परंतु प्रत्यक्ष अनुभव मात्र असा येतो की, बहुतेक औषधोपचार लक्षणानुसारच करण्यात येत असतो. झोप न आल्यास झोपेचे औषध, मलशुद्धी न झाल्यास रेचक, रेच झाल्यास अवष्टंभक, हृदयाची चलबिचल झाल्यास त्यावर औषध, इत्यादि औषधे रोगाचे निदान ठरविल्यावरही देण्यात येतात असे दिसून येईल. शिवाय अनेक रोगांचे निदान होण्यासच आधी काही दिवस लागतात, व काही वेळा तर रोगांचे निदान शेवटपर्यंत होत नाही, परंतु औषधे चालू असतातच. होमिओपाथीमध्ये मात्र असा प्रकार नाही. रोग्याला होणारी सर्व लक्षणे बारकाईने पाहून त्या सर्व लक्षणातील महत्त्वाची लक्षणे एकावेळी लक्षात घेऊन या सर्व महत्त्वाच्या लक्षणांवर मिळून लागू पडणारे एकच औषध योजण्यात येते. निरनिराळ्या लक्षणासाठी निरनिराळी औषधे रोग्याला स्वतंत्र अगर मिसळून देत नाहीत. रोगाला जरी नाव देण्यात आले नाही, तरी सर्व लक्षणांच्या समूहाला म्हणजेच रोगाला लागू पडणारे औषध देण्यात येते असे साधारणपणे म्हणता येईल. वास्तविक पहाता होमिओ-पाथीमध्ये रोगाला औषध देत नाहीत तर रोग दूर करण्यासाठी जीवनशक्तीचा शरीरात जो प्रयत्न चालू असतो व ज्या प्रयत्नाचे स्वरूप निरनिराळ्या लक्षणांनी दृश्यमान अगर भासमान होते, त्या प्रयत्नाच्या दिशेने कार्य करणाऱ्या औषधाची

योजना करावयाची असते. म्हणजेच रोग ऊर्फ (विकारांचा) लक्षणसमुच्चय दूर करावयाचा असतो. तो लक्षणसमुच्चय उत्पन्न करण्यास समर्थ असे औषध द्यावयाचे असते. मात्र ते औषध विशिष्ट पद्धतीने तयार करून फार सूक्ष्म प्रमाणाने देण्यात येते. ज्या औषधाचा चांगल्या प्रकृतीच्या माणसावर प्रयोग केला असता हा विशिष्ट लक्षणसमुच्चय त्या माणसाच्या ठिकाणी उत्पन्न होतो, ते औषध तो विशिष्ट लक्षणसमुच्चय असलेल्या माणसास म्हणजे रोग्यास दिले पाहिजे. ताप, डोके दुखणे, मान दुखणे, आंग दुखणे वगैरे लक्षणे अनेक औषधांनी उत्पन्न होतात. परंतु या लक्षणांबरोबरच त्या त्या औषधांची दुसरी भिन्न भिन्न लक्षणेही उत्पन्न होतात व ती प्रत्येक औषधाची निरनिराळी असतात तेव्हा औषधाची योजना करताना ताप किंवा डोके दुखणे एवढच लक्षात घेऊन चालावयाचे नाही. कारण ताप उत्पन्न करणाऱ्या अनेक औषधांपैकी कोणते द्यावयाचे हे तेवढयाच लक्षणावरून ठरविता येणार नाही. या लक्षणाबरोबर रोग्याची इतर लक्षणेही लक्षात घेऊन व विशेषतः रोग्याच्या वैयक्तिक किंवा विशिष्ट लक्षणांचा विचार करून ती लक्षणे ज्या एका औषधाच्या लक्षणाशी जुळतील तेच औषध दिले पाहिजे.

होमिओपाथिक मटीरिआ मेडिकामध्ये म्हणजे औषधापासून उत्पन्न होणारी लक्षणे देणाऱ्या निघंटुमध्ये मन, डोके, तोंड, पोट, इत्यादी प्रत्येक इंद्रियावर प्रत्येक औषधाचे होणारे परिणाम, व दुसरी काही विशिष्ट लक्षणे इत्यादि गोष्टी शक्य तितक्या विस्तृत व बारकाईने दिलेल्या असतात. यातील काहींचे मुख्यमुख्य परिणाम योजकाच्या लक्षात राहू शकतात. परंतु सर्व औषधांची सर्व बारीकसारीक लक्षणे लक्षात ठेवणे किंवा रोगाच्या बऱ्याच लक्षणांशी जुळणारी एकापेक्षा जास्त औषधे दिसल्यास उरलेल्या सर्व भिन्न औषधांचा विचार करून रोग्यास देण्यासाठी त्यातील एकच औषध निश्चित करणे हे काम सोपे नाही. ते नुसत्या स्मरणशक्तीने करणे कठीण आहे. तसेच फक्त मटीरिआ मेडिका ऊर्फ औषधिनिघंटु जवळ ठेवूनही हे काम भागत नाही. कारण प्रत्येक वेळी सुचलेल्या थोडया औषधांचे सुद्धा सर्व गुण-धर्म विस्तृतपणे वाचून निवड करणे शक्य नाही हे न सांगताही लक्षात येण्यासारखे आहे. लक्षणांचे वैशिष्टय हे होमिओपाथिक चिकित्सेचे महत्त्वाचे अंग आहे. या अंगाचा विचार इतर कोणत्याच चिकित्सेत इतक्या चांगल्या रीतीने केलेला नाही. थंडी, उष्णता, ऊन, वारा, पाऊस, वेळ, शरीराची विशिष्ट अवस्था किंवा हालचाल, अन्न, पेय, इत्यादि अनेक गोष्टीमुळे बाह्यतः एकच असलेल्या रोगातही निरनिराळया माणसांच्या वैयक्तिक लक्षणात कमीजास्त फरक दिसून येतो. या कमीजास्त फरकांनाच लक्षणांचे वैशिष्टय असे म्हणतात. रोग्याच्या वैयक्तिक लक्षणांशी ज्या विशिष्ट औषधाची लक्षणे समान असतील अशाच औषधांची निवड अचूक ठरते. यातील

प्रत्येक लक्षणावरची सर्व औषधे लक्षात आणून, त्या सर्व लक्षणांनी युक्त असे योग्य औषध नक्की करणे हे काम योग्य कोश अगर सूचि याशिवाय करणे नवीन माणसास अशक्य व अनुभविक माणसासही पुष्कळ वेळा कठीण होते. यासाठी प्रत्येक लक्षण देऊन त्यापुढे त्याची औषधे देणारा कोश असल्यास, सर्व लक्षणावरची औषधे पाहून त्या सर्वांवर उपयोगी पडणारे औषध शोधून काढणे सुलभ जाते.

याशिवाय एखाद्या विशिष्ट लक्षणाचा विचार करताना हेही लक्षात ठेवावयाचे असते की, ते लक्षण उत्पन्न करणाऱ्या सर्वच औषधांचे महत्त्व प्रत्येक ठिकाणी सारखेच नसते. काही विशिष्ट अवयवात ते लक्षण उत्पन्न करण्यात काही औषधे श्रेष्ठ असतात तर दुसरी मध्यम किंवा कनिष्ठ प्रतीची असतात. तसेच भावनांच्या बाबतीतही दिसून येते. यामुळे योजनेचे काम जास्त कठीण होते. म्हणून सर्व-साधारणपणे शारीरिक व विशिष्ट इंद्रिये व शरीराचे भाग यानुसार वर्गवारी करून लक्षणे, भावना, व त्यांची वैशिष्ट्ये देऊन त्यातील प्रत्येकापुढे त्याबद्दलची औषधे देताना त्या औषधांचा त्या बाबतीतील दर्जा दाखविल्यास औषधाची योग्य निवड करण्यास सोपे जाते. याकरिता अशा प्रकारे तयार केलेल्या कोशाची आवश्यकता असते.

अशाप्रकारचे अनेक योजनाकोश इंग्रजी जाणणाऱ्या चिकित्सकांना उपलब्ध आहेत. परंतु मराठी भाषेत अशा तऱ्हेचा व्यवस्थित कोश उपलब्ध नाही, काही औषधिनिघंटु (मटीरिया मेडिका) मराठीत लिहिलेले आहेत. पण तेही पुरेसे नाहीत. इंग्रजी भाषेत डॉ. बोनिंग हॉसेन, डॉ. केंट, डॉ. बोजर, डॉ. नेर, डॉ. लिप्, इत्यादि अनेक डॉक्टरांनी असे योजनाकोश तयार केलेले आहेत. त्यात डॉ. केंट याचा कोश साधारणतः सर्वमान्य समजला जातो. व तोच पुष्कळ डॉक्टर लोक वापरतात. हा ग्रंथ बराच मोठा आहे व त्याची किंमतही बरीच आहे. व तो वापरणारांना सुद्धा वर सांगितलेल्या इतर कोशांचाही कित्येकवेळा उपयोग करावा लागतो. परंतु प्रस्तुत ग्रंथकर्त्याच्या गेल्या जवळ जवळ ३० वर्षांच्या होमिओपाथिक चिकित्सेच्या अनु-भवाप्रमाणे पहाता डॉ. बोजर यानी आपल्या 'सिनॉप्टिक की' (Synoptic Key) या पुस्तकात दिलेला छोटा कोश, त्याचा सुटसुटीतपणा व त्यातील औषधांची अनुभविक निवडक योजना, यामुळे तो कोश विशेषतः त्वरित योजनेच्या कामी फारच उपयोगी पडतो. या कोशात दिलेली लक्षणे व भावना यांना उपयोगी पडणारी औषधे निवडक अशी आहेत म्हणून हा कोश तयार करताना त्या पुस्तकाच्या नमुन्यावर, आटोपशीर, परंतु उपयुक्त व कमी संक्षिप्त असा कोश इतर कोशांच्या साहाय्याने मराठीत तयार केल्यास तो मराठी जाणणारास उपयोगी पडेल असे समजून हे पुस्तक लिहिले आहे. व यात योजिलेली औषधे निरनिराळ्या कोशातून पडताळून तसेच शक्य तेथे अनुभवाने योग्य दिसलेली, अशी दिली आहेत. व

यामुळे हे पुस्तक अनेक दृष्टींनी उपयुक्त होईल अशी अपेक्षा आहे, व साधारणत: दुसरे कोश वारंवार पहाण्याची फारशी जरूर पडणार नाही असा भरंवसा आहे. मात्र यामुळे दुसऱ्या मोठ्या कोशांचा उपयोग करावा लागणार नाही असे नव्हे, हे वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षात आले असेलच.

कोश बघून योग्य औषधाची निवड करणे हीसुद्धा एक कला किंवा शास्त्र आहे. लक्षणे व त्यांची वैशिष्ट्ये व त्यांना दिलेल्या औषधांचे कोष्टक मांडून त्यात जे औषध श्रेष्ठ प्रतीचे वाटेल ते रोग्याला बरोबर लागू पडेल असे नाही. कित्येक वेळा कनिष्ठ प्रतीचे किंवा मध्यम प्रतीचे औषध सुद्धा अचूक उपयोगी होईल. याकरता कोणत्या लक्षणाला किंवा वैशिष्ट्याला किती महत्त्व द्यावयाचे याचाही विचार करावा लागतो. काही वेळा मुख्य वाटणाऱ्या वैशिष्ट्यानाही बाजूला सारून एखाद्या क्षुल्लक वाटणाऱ्या लक्षणाला महत्त्व देऊन औषधाची निवड करावी लागते. उदाहरणार्थ प्रस्तुत ग्रंथकर्त्याकडे एकदा एक खोकल्याचा रोगी आला. त्याने ३।४ महिने ॲलोपाथिक औषधोपचार केला होता. या माणसाच्या खोकल्याच्या लक्षणांची चौकशी करताना कफाला काही विशिष्ठ वास, चव वगैरे आहे की काय म्हणून विचारता त्याने ' चव वगैरे ' काही नाही पण कफ बाहेर येताना जड वाटतो म्हणून सांगितले. तसेच दुसऱ्या एका खोकल्याच्या रोग्याने कफ बाहेर येताना गार लागतो म्हणून सांगितले. या दोन्ही रोग्याच्या बाबतीत त्याच्या कफाच्या जडपणावर व गारपणावर औषधाची निवड केली, व त्या औषधानी दोन्ही रोगी थोड्याच दिवसात पूर्ण बरे झाले. कफाचा जडपणा व गारपणा ही लक्षणे असामान्य आहेत म्हणून त्यानाच महत्त्व देणे भाग पडले. होमिओपाथिक चिकित्सेत औषधापासून उत्पन्न होणारी लक्षणे व रोगापासून उत्पन्न होणारी लक्षणे यांचा समसमा संयोग करावा लागतो. म्हणजे चोराला हुडकून काढण्याकरता चोराचे मार्ग जाणून त्याचा शोध लावणाऱ्याची योजना करण्याचे हे शास्त्र आहे; तेव्हा होमिओपाथिक चिकित्सकाच्या अंगी गुप्त पोलीसाचे चातुर्य असणे जरूर आहे. अगदी एखाद्या क्षुल्लक दिसणाऱ्या गोष्टीवरून गुन्ह्याचा तपास लावणाऱ्या गुप्त पोलिसाप्रमाणे होमिओपाथिक चिकित्सकाला फार सूक्ष्म दृष्टी ठेवावी लागते. अगदी स्पष्ट लक्षणाना बाजूला सारून एखाद्या क्षुल्लक वाटणाऱ्या लक्षणाला कसे महत्त्व द्यावे लागते याचा आता उल्लेख केला, तसेच लक्षणांच्या वैशिष्ट्याकडे पाहातानाही हीच दृष्टी काही वेळा ठेवावी लागते. उदाहरणार्थ एखाद्या रोग्याला पाठीवर निजून बरे वाटत असल्यास त्या अवस्थेला उपयोगी पडणाऱ्या औषधांच्या दिलेल्या यादीतूनच निवड केली पाहिजे असे नाही. कदाचित त्यावर दिलेल्या औषधांपैकी कोणतेच उपयोगी ठरणार नाही. अशा वेळी पाठीवर निजून बरे वाटते म्हणजे रोग्याला कुशीवर निजून जास्त होणाऱ्या अवस्थेला जी औषधे दिली

आहेत त्यातलेच एखादे औषध निवडावे लागेल. लक्षणे किंवा भावना पाहताना हेच धोरण लक्षात ठेवावयास पाहिजे. उदाहरणार्थ जुलाब होणे, अंगाला घाम सुटणे, लघवीला जास्त होणे किंवा बायकाना विटाळ जास्त जाणे ही लक्षणे दिसावयास अगदी वेगवेगळी दिसतात, पण जरा बारकाईने विचार केल्यास शरीरातील "हे नैसर्गिक स्राव वाढत्या प्रमाणात आहेत" या एका सदराखाली ते येऊ शकतील. तेव्हा वरील लक्षणांवर दिलेल्या औषधांचा विचार करताना वेळ प्रसंगी 'स्राव एकंदरीत वाढलेले' या सदरात दिलेल्या औषधांवर पण नजर टाकलेली बरी.

जीवनशक्तीच्या (Vital Force) मार्गामध्ये अंतर्गत किंवा बाह्य कारणामुळे बिघाड झाला म्हणजे ही रुद्ध झालेली जीवनशक्ती प्रकृतिधर्मानुसार शरीरातील कोणत्यातरी एका किंवा जास्त इंद्रियात किंवा अवयवात लक्षणे उत्पन्न करून ही शक्ती आपला नेहमीचा मार्ग बिघडल्याची व तो दुरुस्त करणाऱ्या आपल्या प्रयत्नाची जाणीव करून देते. इंद्रिये व अवयव यांच्या कार्यभिन्नतेमुळे लक्षणात भिन्नता दिसून आली तरी त्यांचे आद्य कारण नेहमीचा मार्ग बिघडलेली जीवनशक्ती हेच होय व म्हणूनच होमिओपाथिक चिकित्सेचे हे मूलतत्त्व ध्यानात बाळगून भिन्न भिन्न दिसणाऱ्या पण वर दर्शविल्याप्रमाणे मूलतः समानधर्मी असणाऱ्या अनेक लक्षणांवर दिलेल्या औषधांचा तुलनात्मक दृष्टीने अभ्यास करणे आवश्यक आहे.

सर्वसामान्य शरीरांवर होणाऱ्या भावना व लक्षणे व त्यांची वैशिष्टये व त्यावर या पुस्तकात तसेच अशा प्रकारच्या दुसऱ्या कोशात दिलेली औषधे यांचा अंतर्भाव थोड्या बहुत फरकाने विशिष्ट इंद्रियांच्या किंवा अवयवांच्या सदराखाली झालेला आढळून येईल. तेव्हा एखाद्या विशिष्ट इंद्रियांच्या लक्षणावर किंवा त्याच्या वैशिष्टयावर दिलेल्या औषधांचा विचार करताना, त्या लक्षणासाठी व वैशिष्टयाच्या समानधर्मी सामान्य लक्षणासाठी व वैशिष्टयासाठी दिलेल्या औषधांचा विचार करणे जरूर आहे. किंबहुना अशाच तऱ्हेचा विचार करून औषधाची निवड केली तर ती अचूक होण्याचा पुष्कळ वेळा जास्त संभव असतो.

लक्षणांचा व त्यांच्या वैशिष्टयाचा विचार करताना मानसिक लक्षणांचा विचार करणे हे होमिओपाथिक चिकित्सेचे दुसरे एक महत्त्वाचे अंग आहे. कित्येकवेळा आजारी माणसांची मानसिक लक्षणे स्पष्टपणे दृष्टोत्पत्तीस येतात. परंतु अनेकवेळा शिष्टाचार पाळण्याच्या बंधनामुळे मोठ्या माणसांच्या बाबतीत अशा लक्षणांची माहिती त्यांच्या नातेवाईकांकडून काढून घ्यावी लागते. एरवी स्वभावाने थंड असलेले काही इसम आजारीपणात इतके चिडखोर बनतात की शुश्रूषा करणाऱ्या लोकांना नकोसे होते. तर दुसरी काही आजारी माणसे यातना होत असताना सुद्धा थंड असतात. काही माणसे आपली लक्षणे सांगूनच थांबत नाहीत तर इतर अनेक गोष्टी सुद्धा सुनावण्यास कमी

करीत नाहीत; तर दुसरे विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे सुद्धा धड देत नाहीत. लहान मुलांच्या बाबतीत शिष्टाचाराचे बंधन नसल्यामुळे त्यांची मानसिक अवस्था स्पष्ट दिसून येते. मानसिक लक्षणे स्पष्ट असल्यास इतर लक्षणांना किंवा त्यांच्या वैशिष्ट्याला फारशी किंमत न देता मानसिक लक्षणांवरच औषधाची निवड करणे कित्येकदा योग्य असते. एक दोन उदाहरणे दिल्यास याचा जास्त उलगडा होईल.

एकदा एका ४।५ वर्षे वयाच्या मुलाला १०२°, १०३° डिग्री ताप आला. तो मुलगा डॉक्टरला तर राहोच पण आपल्या आईला किंवा वडिलांना सुद्धा अंगाला हात लावू देण्यास राजी नव्हता. त्याच्याकडे पाहताच स्वारी चिडून ओरडावयास लागावयाची. अशा मुलाला तपासावयाचे कसे व औषध कसे द्यावयाचे याचा नेहमीच्या डॉक्टरला पेच पडला. होमिओपाथिक औषधे गोड असतात तेव्हा ती कशीतरी पाण्यातून देता येतील या कल्पनेने ग्रंथकर्त्याला बोलावणे आले. अर्थातच मुलाने त्यालाही तपासू दिले नाहीच. पण अंगाला हात लावण्याने किंवा पाहण्याने चिडावयाचे ही दोन मानसिक लक्षणे औषधाची निवड करण्यास पुरेशी होती. औषध दिल्यानंतर दुसरे दिवशी त्याचा ताप तर कमी झालाच पण स्वारी इतकी थंडावली की त्याने बिनतक्रार तपासू दिले. एक दोन दिवसात त्याचा ताप साफ उतरून तो पूर्ववत खेळावयास लागला. दुसरे उदाहरण मोठ्या माणसाच्या बाबतीतले असेच मजेदार आहे. एक रोगी सुमारे ५० वर्षे वयाचा जवळ जवळ ७।८ महिने डॉक्टर–वैद्यांची औषधे घेऊन अगदी कंटाळला होता. कशानेच गुण वाटेना म्हणून होमिओपाथीने तरी गुण वाटतो की काय हे पाहाण्याकरता त्याच्या नातेवाईकांनी ग्रंथकर्त्यास बोलाविले. त्याच्या पलंगाच्या शेजारी ठेविलेल्या खुर्चीवर बसताच स्वारीने "तुम्ही डॉक्टर मला तपासावयास आलात काय? तपासा तर" असे म्हणून दोन्ही पाय लांब करून तपासणाऱ्याच्या मांड्यावर ठेविले व तणावून स्वारी निजली. त्याची पत्नी व इतर नातेवाईक हा प्रकार पाहून सर्दच झाले. त्याचे पाय दूर न करता त्याच्या पत्नीला व इतर नातेवाईकांना काही प्रश्न विचारले. त्यानंतर त्यालाही काही प्रश्न विचारले. त्यांची काही तरी विक्षिप्त उत्तरे त्याने दिली. काही वेळाने त्याचे पाय दूर करून व त्याला न तपासताच उठून "औषध पाठवितो ते घ्या व उद्या कसे काय वाटते ते कळवा" असे सांगताच "हो, हो, डॉक्टर या आता, उद्या काय वाटते ते खात्रीने कळवितो" असे विक्षिप्तपणे हसत म्हणून स्वारी पुन्हा नीटपणे अंथरुणावर निजली. या लक्षणांना अनुसरून दिलेल्या औषधाने दुसऱ्या दिवशी या रोग्याची वृत्ति इतकी बदलली की त्याने आपण होऊन पुन्हा बोलावणे पाठविले व आदल्या

दिवशी केलेल्या वर्तनाची मनःपूर्वक क्षमा मागितली. नंतर त्याला होत असलेल्या लक्षणानुसार योग्य औषधाची योजना केल्यावर तो बरा झाला.

होमिओपाथिक औषधे मनःस्थिती पाहून दिल्याने रोगावर कशी उपयोगी पडतात हे वर दिलेल्या उदाहरणांवरून ध्यानात येईल. अभ्यासूंना विचार करण्याची प्रवृत्ति असावी या हेतूने दिलेल्या उदाहरणात कोणत्या औषधाची निवड केली हे लिहिण्याचे मुद्दामच वगळले असले तरी कोशात लक्षणे कशी बघावयाची व औषधाची निवड करताना कोणत्या लक्षणाना कसे व किती महत्त्व द्यावयाचे हे जास्त स्पष्ट करण्याकरता खाली दोन रोग्यांची लक्षणे दिली आहेत :

( १ ) **रोगी**– पुरुष वय सुमारे ४०.

**लक्षणे**– दोन्ही पाय दुखतात.
पाय दाबल्याने बरे वाटते.
चालताना किंवा पाय हलविल्याने बरे वाटते.
ढेकर आली किंवा वात सरला म्हणजे बरे वाटते.

वरील रोग्याला मधुमेहासारखा विकार नव्हता व पायाचे दुखणे सुरू होण्यास विशिष्ट असे कोणतेच कारण घडले नव्हते, वरील लक्षणसमुच्चयात ढेकर येऊन किंवा वात सरून पाय दुखणे कमी होणे हे लक्षणाचे वैशिष्ट्य विशेष महत्वाचे आहे कारण त्या वैशिष्ट्याचा पाय दुखण्याशी अर्थाअर्थी काही संबंध नाही. तेव्हा ते वैशिष्ट्य अगोदर घ्यावयाचे. त्यावर सर्वसामान्य लक्षणांच्या वैशिष्ट्यात पुढील औषधे आहेत –

वात वर खाली सरल्याने ब वा :– **आर्जे-ना**; कलि-का; ग्रफाय; व्हेरा-आ; ***सॅन्वि.***

दाबल्याने ब वा :– आर्जे-ना.

चालताना किंवा पाय हलविल्याने ब वा :– **आर्जे-ना**; कलि-का.

वरील लक्षणसमुच्चयात 'आर्जे-ना' हे एकच औषध समायिक आहे. ते औषध दिल्याने तो रोगी बरा झाला.

( २ ) **रोगी– पुरुष वय सुमारे ५०.**

**लक्षणे :**– पोटदुखी. पोट डाव्या बरगड्याखाली जठराच्या जागेत दुखते. दाबल्याने जास्त दुखते.
पोटावर निजून बरे वाटते, किंवा डाव्या कुशीवर निजल्याने बरे वाटते. खाण्याने बरे वाटते परंतु ३–४ तासानी पुन्हा दुखणे सुरू होते, व पुन्हा थोडे खाल्ले की बरे वाटते.
वात सरला किंवा ढेकर आल्याने बरे वाटते.

वरील लक्षणसमुच्चयात 'पोटावर निजून बरे वाटते' ही अवस्था विशेष महत्त्वाची आहे. कारण, त्या अवस्थेत त्याला का बरे वाटावे याचे काहीच कारण सांगता येण्यासारखे नाही. त्याचप्रमाणे दाबल्याने जास्त त्रास होऊनसुद्धा रोग्याला वेदना होत असलेल्या कुशीवर निजल्याने पण बरे वाटते. तेव्हा ही दोन लक्षणाची वैशिष्ट्ये प्रथम घेतल्यास त्यात तीन औषधे 'केलि; सेपि; व स्टॅनम' समाईक आहेत असे दिसून येईल. त्यानंतर खाण्याने बरे वाटते यात 'केलि व सेपि' ही दोन औषधे येतात. आता वात खाली वर सरल्याने बरे वाटते या वैशिष्ट्यात 'केलि, व सेपि' ही दोन औषधे येत नाहीत, परंतु वात किंवा ढेकर हे शरीरातील स्रावच आहेत तेव्हा स्राव गेल्याने बरे वाटते या वैशिष्ट्यात 'सेपि' हे औषध येते. या रोगाचे निदान जठरातील आम्ल वाढले आहे, व्रण नाही ( कारण क्ष किरणाने घेतलेल्या फोटोत व्रण दिसला नाही ) असे केले होते. जठरातील आम्ल पित्त हे सदर पाहिल्यास त्यात 'सेपि' हे औषध आहे असे आढळून येईल. तेव्हा 'सेपिआ' या औषधाचीच निवड योग्य ठरून त्या औषधानी तो रोगी बरा झाला.

होमिओपाथिक चिकित्सकाकडे रोगी रोगाच्या प्रथमावस्थेत कधीच येत नाहीत. अगोदर ॲलोपाथिक नंतर आयुर्वेदिक औषधे घेऊन बरे वाटेनासे झाले म्हणजे या चिकित्सेकडे रोगी वळतात; त्यामुळे रोग्याच्या मूळच्या लक्षणात औषधाच्या दुष्परिणामाची भर पडून लक्षणे गुंतागुंतीची होतात. ही गुंतागुंत कशी सोडवावयाची याकरिता वरील उदाहरणे दिली आहेत. प्रस्तावनेत सर्व बारीकसारीक गोष्टींचा ऊहापोह करता यते नाही. तरीपण वरील उदाहरणांवरून कोश कसा बघावा याचा बोध होईल असा भरंवसा वाटतो.

वरीलप्रमाणे कोशात बघून औषधांची निवड करताना काही वेळेस २।३ औषधे समायिक येण्याचा संभव आहे अशा वेळेस औषधाची निवड निश्चित करण्याकरता निघंटूचे अवलोकन अवश्य आहे.

ही चिकित्सा म्हणजे कला आहे. सतत परिश्रम व विचारपूर्वक अभ्यासानेच ही कला साध्य होते. औषधिनिघंटूत दिलेल्या औषधांच्या लक्षणांचा अभ्यास व कोशात दिलेल्या लक्षणांच्या बाबतीत त्यांना दिलेला दर्जा याचा काळजीपूर्वक अभ्यास सतत केल्यानेच अनेक औषधांच्या वैयक्तिक बारकाया लक्षात येतात व रोगी आपली लक्षणे सांगताना त्यापैकी कोणत्या लक्षणावर किंवा वैशिष्ट्यावर मुख्यतः लक्ष दिले पाहिजे याचा निश्चय होतो व औषधाची निवड सुलभ होते. औषधांचे श्रेष्ठ कनिष्ठादि गुण म्हणजे औषधाचा दर्जा दाखविण्याकरता औषधाची नावे

छापताना निरनिराळे तीन टाइप वापरले आहेत. जाडा टाइप औषधाचा पहिला दर्जा दाखवितो, मध्यम टाइप दुसरा व साधा बारीक टाइप तिसरा दर्जा दाखवितो.

लक्षणभावनाकोश व निघंटु हे दोन्ही ग्रंथ लिहून तयार झाल्यानंतर ते अनेक वर्षे लेखकाजवळ पडून राहिले होते; ते छापून निघतील असा लेखकाला भरंवसा वाटत नव्हता. परंतु १९६० साली महाराष्ट्र राज्य सरकारने महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ स्थापन केले, या मंडळातर्फे हे ग्रंथ छापून निघण्याचा संभव आहे असे वाटल्यामुळे हे दोन्ही ग्रंथ मंडळाकडे परीक्षणार्थ पाठवावेत असे लेखकाचे पुतणे चि. ब. न. फाटक व त्यांची पत्नी चि. सौ. देवयानी फाटक या उभयतांनी लेखकाला अतिशय आग्रह केला. या आग्रहामुळे शेवटी लेखकाने हे ग्रंथ मंडळाकडे परीक्षणार्थ पाठविण्याचे धाडस केले. सुदैवाने मंडळाच्या परीक्षकांना हे ग्रंथ पसंत पडून दोन्ही ग्रंथ छापण्याचे ठरले. त्याप्रमाणे पहिला ग्रंथ होमिओपाथिक निघंटु ता. २ जानेवारी १९६४ रोजी प्रसिद्ध झाला व आता दुसरा ग्रंथ लक्षणभावनाकोश छापून प्रसिद्ध होत आहे. याबद्दल मंडळातील सर्व सदस्यांचे जेवढे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत. त्याचप्रमाणे ज्यांच्या आग्रहामुळे हे कार्य सिद्धीस जाण्यास मदत झाली ते लेखकाचे पुतणे व त्यांच्या पत्नी या उभयतांचेही आभार मानणे आवश्यक आहे.

मराठीत अशा तऱ्हेचे ग्रंथ तयार व्हावेत म्हणून लेखकाचे एक स्नेही व प्रार्थना समाजाच्या मराठी शाळेतील प्रमुख कै. वि. ब. वेलणकर यानी लेखकाला सतत तगादा लावला नसता तर हे दोन्ही ग्रंथ लेखकाच्या हातून तयार झाले असते असे वाटत नाही, कै. वेलणकर यानी तयार झालेली हस्तलिखिते पाहिली, पण आज छापून निघालेले ग्रंथ पाहण्यास ते हयात नाहीत याबद्दल लेखकाला अतिशय खेद होत आहे.

प्राज्ञप्रेसच्या कामगार बंधूनी कोशाच्या कंपोजिंगचे किचकट काम फारच काळजीपूर्वक केले, तसेच प्राज्ञपाठशाळेचे आजीव सदस्य श्री. वासुदेवशास्त्री कोनकर यांनी वेगवेगळ्या आकाराच्या टाइपांची लक्षपूर्वक जुळवाजुळव केली याबद्दल ते सर्व आभाराचे धनी आहेत. प्रुफे तपासताना श्री. **पां. गो. आपटे** यांनी शक्य तितकी मुद्रणतपासणीची काळजी घेतली. तरीसुद्धा छापताना बऱ्याच चुका झालेल्या आहेत. शुद्धिपत्रकात दिल्याप्रमाणे चुका दुरुस्त करून ग्रंथ वापरावा अशी विनंति आहे.

मुंबई<br>
ऑक्टोबर १९६४

**शं. र. फाटक**

# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| मानसिक विकार . . . | १-३९ |
| सर्वसाधारण भावना व विकार . . | ४०-१२४ |
| डोके . . . | १२५-१४७ |
| डोक्याची मागील बाजू व मानेचा भाग . . | १२८ |
| ,, मेंदू . . . | १३० |
| ,, घेरी . . . | १३३ |
| डोक्याचे बाह्यांग, त्वचा व कवटी . . | १४८-१५१ |
| डोळे . . . | १५२-१७० |
| ,, डोळ्याचे कोपरे . . . | |
| ,, पापण्या व त्यांचे विकार . . | |
| ,, दृष्टी व तिचे विकार . . | १५८-१६४ |
| कान . . . | १७१-१७८ |
| ,, कानातील आवाज . . . | १७२ |
| ,, ऐकू चांगले येत नाही . . . | १७३ |
| नाक व शेजारच्या हाडातील पोकळ्या . . | १७९-१९२ |
| ,, सर्दी वारंवार होण्याची प्रवृत्ती . | स. सा. भावना व विकार पहा |
| ,, शिंका . . . | १८७ |
| ,. सर्दी . . . | १८८ |
| चेहरा . . . | १९३-२०५ |
| ,, ओठ . . . | १९३ |
| ,, गाल . . . | १९५ |
| ,, जबडा . . . | १९६ |
| दात . . . | २०६-२१२ |
| हिरड्या . . . | २१० |
| टाळा . . . | २१३-२१४ |
| जीभ . . . | २१५-२२० |
| चव . . . | २२१-२२४ |

| | |
|---|---|
| तोंड . . . | २२५–२३० |
| घसा . . . | २३१–२४० |
| उदर . . . | २४१–२६४ |
| ,, कुशी . . . | २४१ |
| ,, ओटिपोट . . . | २४२ |
| ,, पोटाची खळी . . . | २४३ |
| ,, कटीभाग . . . | २४४ |
| ,, मलावरोध . . . | २४९ |
| ,, वात व धरण्याची प्रवृत्ति . . | २५१ |
| ,, शौच व ते होण्याचे प्रकार . . | २५४–२६१ |
| ,, हगवण . . . | २६१ |
| उदराचे बाह्यांग . . . | २६५ |
| जठर . . . | २६६–२९४ |
| ,, आम्लपित्त . . . | २६७ |
| ,, इच्छा, आवड खाण्यापिण्याची . . | २६७–२७० |
| ,, उचकी . . . | २७० |
| ,, ओकारी . . . | २७१–२७७ |
| ,, ढेकरा . . . | २७८ |
| ,, तहान . . . | २८१ |
| ,, तिटकारा, खाण्यापिण्याचा . . | २८२ |
| ,, भूक . . . | २८६ |
| यकृत . . . | २९५–२९८ |
| पांथरी . . . | २९९ |
| गुद व गुदद्वार . . . | ३००–३०६ |
| गुदद्वार व जननेंद्रिये यामधील भाग . . | ३०७–३०८ |
| मूत्रेंद्रिये . . . | ३०८–३२८ |
| ,, मूत्रपिंड . . . | ३०८ |
| ,, मूत्रनलिका . . . | ३०९ |
| ,, मूत्राशय . . . | ३१० |
| ,, मूत्रग्रंथि . . . | ३१२ |
| ,, मूत्रमार्ग . . . | ३१३ |

,, लघवी व ती होण्याचे प्रकार . . ३१६–३२८
जननेंद्रिये ( पुरुष व स्त्री ) . . ३२८–३२९
पुरुषजननेंद्रिये . . . ३३०–३३७
,, अंड . . . ३३०
,, वीर्यवाहिनी नलिका . . . ३३१
,, वृषण . . . ३३१
,, शिश्न . . . ३३३
,, शिश्नाच्या बोंडीची कातडी . . ३३३
,, शिश्नाची बोंडी . . . ३३३
,, वीर्य, वीर्यपात . . . ३३६
स्त्रीजननेंद्रिये . . . ३३८–३५५
,, गर्भाशय . . . ३३८
,, गर्भाशय मुख . . . ३४०
,, योनि . . . ३४१
,, योनिद्वार . . . ३४२
,, रजःपिंड . . . ३४२
,, धुपणी . . . ३४४
,, वाखा . . . ३४७
,, वायगोळा . . . ३४७
,, विटाळ व तो जाण्याचे प्रकार . . ३४८–३५३
,, संभोगेच्छा . . . ३५४
,, वेणा . . . ३५४
स्तन . . . ३५६–३५९
,, दूध व त्याचे विकार . . . ३५८
स्तनाग्रे . . . ३६०–३६१
श्वासोच्छ्वास . . . ३६२–३६९
खोकला . . . ३७०–३७८
कफ ( खाकरा ) . . . ३७९–३८१
छाती व फुप्फुसे . . . ३८२–३८७
छातीचा बाह्य भाग . . . ३८८–३९०
कंठ व श्वासनलिका . . . ३९१–३९५

| | |
|---|---|
| रुधिराभिसरण . . . | ३९६--४०६ |
| ,, हृदय . . . | ३९६ |
| ,, हृदयाची धडधड . . . | ४०० |
| ,, नाडी . . . | ४०७-४०८ |
| ,, रक्तवाहिन्या . . . | ४०९-४१० |
| गळा . . . | ४११-४१३ |
| मान . . . | ४१४-४१७ |
| पाठ . . . | ४१८-४२३ |
| कणा . . . | ४२४-४२६ |
| तिकोनी हाडांचा भाग . . . | ४२७ |
| तिकोनी हाडे . . . | ४२८ |
| कंबर . . . | ४२९-४३२ |
| माकडहाडाचा भाग . . . | ४३३-४३४ |
| गुदास्थि . . . | ४३५ |
| हात . . . | ४३६-४३९ |
| वरचा, पुढला . . . | ४४२ |
| खाक . . . | ४४० |
| खांदा व भाग . . . | ४४१ |
| पंजे (तळहात) . . . | ४४३-४४७ |
| बोटे हाताची . . . | ४४८-४५२ |
| ,, पायाची . . . | ४७५-४७६ |
| सांधे, . . . | ४५३-४५४ |
| ,, खांदा . . . | ४५३ |
| ,, कोपर . . . | ४५३ |
| ,, मनगट . . . | ४५४ |
| ,, बोटाचे . . . | ४५४ |
| ,, कमरेचे . . . | ४७७ |
| ,, गुडघे . . . | ४७७ |
| ,, घोटे . . . | ४७९ |
| हाडे सर्वसाधारण (हाताची,) . . | ४५५ |
| पायाची . . . | ४८१ |

| | |
|---|---|
| पाय . . . | ४५५–४५९ |
| कमरेच्या सांध्याचा भाग . . . | ४५८ |
| कुल्ले . . . | ४५९ |
| जांघा . . . | ४५९–४६० |
| मांड्या . . . | ४६१–४६४ |
| तंगड्या . . . | ४६५–४६७ |
| पाऊले ( तळपाय ) . . . | ४६८–४७४ |
| बोटे ( पायाची ) . . . | ४७५–४७९ |
| सांधे . . . | ४७७–४८० |
| झोप . . . | ४८१–४८९ |
| ,, जागे होणे . . . | ४८१ |
| ,, जांभया . . . | ४८२ |
| ,, गुंगी येणे . . . | ४८४ |
| ,, निद्रानाश . . . | ४८६ |
| ,, झोपेत निजण्याची तऱ्हा . . . | ४८७ |
| ,, स्वप्ने . . . | ४८८ |
| थंडी वाजणे–शहारे–गारवा . . . | ४९०–४९४ |
| ज्वर ( ताप )–आग–उष्णता . . | ४९५–४९९ |
| घाम . . . | ५००–५०५ |
| त्वचा–कातडे . . . | ५०६–५१८ |
| लक्षणांचे वैशिष्टय ( सर्वसामान्य ) . , | ५१९–५६५ |
| ,, मानसिक . . . | ३७–३९ |
| ,, डोक्याच्या . . . | १४३–१४७ |
| ,, डोळ्याच्या . . . | १६९–१७० |
| ,, कानाच्या . . . | १७८ |
| ,, नाकाच्या . . . | १९२ |
| ,, चेहेऱ्याच्या . . . | २०५ |
| ,, दाताच्या . . . | २०९ |
| ,, तोंड व घसा . . . | २४० |
| ,, उदर व जठर . . . | २९२–२९४ |
| ,, यकृत . . . | २९७–२९८ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ,, गुद व गुदद्वार | . | . | . | ३०६ |
| ,, स्त्रीजननेंद्रिये | . | . | . | ३५५ |
| ,, श्वासोच्छ्‌वास | . | . | . | ३६७–३६९ |
| ,, खोकला | . | . | . | ३७४–३७८ |
| ,, छाती | . | . | . | ३८९–३९० |
| ,, कंठ व श्वासनलिका | . | . | . | ३९५ |
| ,, हृदयाच्या | . | . | . | ४०५–४०६ |
| ,, मान | . | . | . | ४१७ |
| ,, पाठ | . | . | . | ४२१–४२३ |
| ,, कणा | . | . | . | ४२६ |
| ,, कंबर | . | . | . | ४३१ |
| ,, हात | . | . | . | ४३८–४३९ |
| ,, पाय | . | . | . | ४५७–४५८ |




# औषधांची सूची

| संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप | संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप |
|---|---|---|---|
| अकोनाईट | अको. | आरम मेटॅलिकम | आरम-मे. |
| अडोनिस व्हल्गॅरिस | अडोनि. | आरम मूरिआटिकम | आरम-मू. |
| अगारिकस | अगारि. | आरम ट्रायफायलम | आरम-ट्रा. |
| अनाकार्डिअम | अनाका. | आर्जेन्टम नायट्रिकम | आर्जे-ना; नाय. |
| अपोसायानम | अपोसा. | आर्जेन्टम मेटॅलिकम | आर्जे-मे. |
| अब्रोटेनम | अब्रो. | आर्टेमीसिआ व्हल्गॅरिस | आर्टेम-व्ह. |
| अमिल नायट्रोसम | अमिल-ना. | आर्निका मॉन्टेना | आर्नि. |
| अमोनिअम कार्बोनिकम | अमो-का. | आर्सेनिकम आल्बम | आर्से. |
| अमोनिअम ब्रोमेटम | अमो-ब्रो. | आर्सेनिकम आयोडेटम | आर्से-आयो. |
| अमोनिअम मूरिआटिकम | अमो-मू. | आर्सेनिकम सल्फुरेटम फ्लेवम | आर्से-स-फ्ले |
| अरानिआ डायाडिमा | अरानि. | आस्टेरिआस रुबेन्स | आस्टे-रु. |
| अरेलिआ रेसिमोसा | अरेलि. | ऑसिमम कॅनम | ऑसि. |
| अर्टिका युरेन्स | अर्टि. | ऑस्मिअम | ऑस्मि. |
| अलेट्रिस | अलेट्रि. | ऑक्झॅलिक ॲसिड | ऑक्झ-ॲसि. |
| अल्युमिना | अल्युमि. | इक्विसेटम | इक्वि. |
| अल्युमेन | अल्युमे. | इग्नेशिआ | इग्ने. |
| असाफिटिडा | असाफि. | इथूसा सिनापिअम | इथू. |
| असारम | असार. | इनान्थ क्रोकेटा | इनान्थ. |
| असेटिक ॲसिड | असेटि-ॲसि. | इन्डिगो | इन्डिगो. |
| अस्टिलेगो | अस्टि. | इपिकॅकुआन्हा | इपि. |
| अक्टिआ स्पायकटा | अक्टि-स्पा. | इपिफेगस | इपिफे. |
| अग्नस कॅस्टस | ॲग्नस. | इरिजिरान | इरिजि. |
| ॲन्टिमोनिअम क्रूडम | ॲन्टि-क्रू. | इलाप्स कोरालिनस | इलाप्स. |
| ॲन्टिमोनिअम टार्टारिकम | ॲन्टि-टा. | इस्कूलस | इस्कू. |
| ॲन्थ्रासिनम | ॲन्थ्रा. | एकीनेसिआ | एकीने. |
| ॲम्ब्रा ग्रिजिआ | ॲम्ब्रा. | एपिस मेलिफिका | एपि. |
| आयरिस | आयरि. | एबिस कॅनॅडेन्सिस | एबि-कॅ. |
| आयोडिअम | आयो. | एलोज | एलो. |

| संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप | संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप |
|---|---|---|---|
| ऐलान्थस | ऐलान्थ. | कॅल्करिआ फ्लुओरिका | कॅल्क-फ्लु. |
| ओनास्माडिअम | ओनास्मा. | कॅल्करिआ सल्फुरिकम | कॅल्क-स. |
| ओपिअम | ओपि. | कॅल्करिआ हैपोफास्फोरिकम | कॅल्क-हैपो. |
| ओरिगॅनम | ओरिगॅ. | कॅस्टोरिअम | कॅस्टो. |
| ओलिअम ॲनिमॅलिस | ओलि-ॲनि. | काफिआ | काफि. |
| ओलिअंडर | ओलिअं. | कामिआ | कामि. |
| ओलिअम जेकोरिस | ओलि-जे. | कामोमिल्ला | कामो. |
| कलि आयोडेटम | कलि-आयो. | कार्डुअस मेरिआनस | कार्डु-मे. |
| कलि आर्सेनिकम | कलि-आर्से. | कार्नस | कार्नस. |
| कलि कार्बोनिकम | कलि-का. | कार्बो ॲनिमॅलिस | कार्बो-ॲनि. |
| कलि क्लोरिकम | कलि-क्लो. | कार्बोलिक ॲसिड | कार्बो-ॲसि. |
| कलि नायट्रिकम | कलि-ना. | कार्बो व्हेजिटॅबिलिस | कार्बो-व्हेजि. |
| कलि फास्फोरिकम | कलि-फा. | कार्बोनिअम सल्फुरेटम | कार्बो-स. |
| कलि बायक्रोमिकम | कलि-बाय; बा. | कालिसोनिआ | कालिसो. |
| कलि ब्रोमेटम | कलि ब्रो. | कालोफायलम | कालो. |
| कलि मूरिआटिकम | कलि-मू. | काल्चिकम | काल्चि. |
| कलि सल्फुरिकम | कलि-स. | कास्टिकम | कास्टि. |
| कलि सायानेटम | कलि-सा. | किनिमम आर्सेनिकोसम | किनि-आर्से. |
| कलाडिअम | कलाडि. | किनिमम सल्फुरिकम | किनि-स. |
| कॅक्टस | कॅक्ट. | किनोपोडिअम | किनो. |
| कॅडमिअम सल्फुरेटम | कॅडमि-स. | कुप्रम मेटॅलिकम | कुप्रं. |
| कॅनॅबिस | कॅनॅबि. | कुप्रम आर्सेनिकम | कुप्रं-आर्से. |
| कॅन्थारिस | कॅन्था. | कुबेबा | कुबे. |
| कॅप्सिकम | कॅप्सि. | कुलेक्स | कुले. |
| कॅम्फर | कॅम्फ. | केलिडोनिअम | केलि. |
| कॅलंडुला | कॅलंडु. | कोका | कोका. |
| कॅल्करिआ आयोडेटा | कॅल्क-आयो. | कोकेना | कोकेना. |
| कॅल्करिआ आर्सेनिका | कॅल्क-आर्से. | कोक्युलस | कोक्यु. |
| कॅल्करिआ कार्बोनिका | कॅल्क-का. | कोकस कॅक्टाय | कोक-कॅ. |
| कॅल्करिआ फास्फोरिका | कॅल्क-फा. | कोनिअम | कोनि. |

| संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप |
|---|---|
| कोबाल्टम | कोबा. |
| कोमोक्लाडिआ | कोमो. |
| कोरालिअम रुब्रम | कोरा-रु. |
| कोलेस्टेरिनम | कोलेस्टि. |
| कोलोसिंथ | कोलो. |
| क्रटिगस | क्रॅटिग. |
| क्रिआसोट | क्रिआसो. |
| क्रोकस | क्रोक. |
| क्रोटन टिग्लिअम | क्रोट-टि. |
| क्रोटेलस कॅस्कॅव्हेला | क्रोटे-कॅ. |
| क्रोटेलस हारिडस | क्रोटे-हा. |
| क्लिमॅटिस | क्लिमॅटि. |
| क्लोरम | क्लोर; रि. |
| क्लोरल हैड्रेट | क्लोरल-है. |
| गासिपिअम | गासि. |
| गॅम्बोजिआ | गॅम्बो. |
| गिम्नोक्लाडस | गिम्नो. |
| गेल्सेमिअम | गेल्से. |
| ग्रटिओला | ग्रटि. |
| ग्रफाइट | ग्रफाय. |
| ग्रिंडेलिआ | ग्रिंडे. |
| ग्लोनोइन | ग्लोनो. |
| ग्वाईआकम | ग्वाई. |
| चिओनॅन्थस | चिओ. |
| चिमाफायलिआ | चिमा. |
| जट्रोफा | जट्रो. |
| जॅबोरंडि | जॅबो. |
| जालप | जालप. |
| झॅन्थोझायलम | झॅन्थो. |
| झिंकम | झिंक. |
| झिंक आयोडाईड | झिंक-आयो. |
| झिंक आर्सेनाइट | झिंक-आर्से. |
| झिंक क्रोमेट | झिंक-क्रो. |
| झिंक फास्फेट | झिंक-फा. |
| झिंक व्हॅलेरिआनेट | झिंक-व्हॅले. |
| झिंजिबेरिस | झिंजि. |
| टरेन्टुला | टरेन्टु. |
| टरेन्टुला कुबेन्सिस | टरेन्टु-कु. |
| टॅबॅकम | टॅबॅक. |
| टॅरॅक्सकम | टॅरॅक्स. |
| टिलिआ | टिलि. |
| टॅरेबिन्थिना | टॅरेबि. |
| टेलिआ | टेलि. |
| टेल्युरिअम | टेल्यु. |
| ट्युबरकुलिनम | ट्युब. |
| ट्रांबोडिअम | ट्रांबो. |
| ट्रिलिअम | ट्रिलि. |
| डल्कामारा | डल्का. |
| डाफ्ने | डाफ्ने. |
| डायास्कोरिआ | डायास्को. |
| डिक्टम्नस | डिक्टा. |
| डिजिटॅलिस | डिजि. |
| डिफ्थेरिनम | डिफ्थे. |
| ड्रोसेरा | ड्रोसे. |
| थायराडिनम | थायरा. |
| थूजा | थूजा. |
| थेरिडिआन | थेरि. |
| नक्स मोस्चेटा | नक्स-मो. |
| नक्स व्हामिका | नक्स-व्हा. |
| नॅफेलिअम | नॅफेलि. |

| संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप | संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप |
|---|---|---|---|
| नाजा | नाजा. | फेरम फास्फरिकम | फेरम-फा. |
| नायट्रिक अॅसिड | नाय-अॅसि. | फेलांड्रिनम | फेलांड्रि. |
| नेट्रम कार्बोनिकम | नेट्र-का. | परॅक्सिनस | परॅक्सि. |
| नेट्रम फास्फोरिकम | नेट्रम-फा. | फ्लुओरिक अॅसिड | फ्लुओ-अॅसि. |
| नेट्रम मूरिआटिकम | नेट्र-मू. | बडिआगा | बडि. |
| नेट्रम सल्फुरिकम | नेट्र-स. | बर्बेरिस व्हल्गॅरिस | बर्बे. |
| परेरा ब्रेव्हा | परेरा. | बर्सा पॅस्टोरिस | बर्सा. |
| पलाडिअम | पलाडि. | बॅप्टिसिआ | बॅप्टि. |
| पल्सटिल्ला | पल्स. | बॅरिटा कार्बोनिका | बॅरि-का. |
| पॅरिस | पॅरि. | बॅरिटा मूरिआटिका | बॅरि-मू. |
| पायरोजेन | पायरो. | बिस्मथ | बिस्म. |
| पालिगोनम | पालिगो. | बुफो | बुफो. |
| पिओनिआ | पिओनि. | बेन्झाइक अॅसिड | बेन्झा-अॅसि. |
| पिक्रिक अॅसिड | पिक्रि-अॅसि. | बेलाडोना | बेला. |
| पेट्रोलिअम | पेट्रो. | बेलिस पॅरोनिस | बेलिस. |
| पेट्रोसेलिनिनम | पेट्रोसे. | बोथ्राप्स | बोथ्रा. |
| पोडोफायलम | पोडो. | बोराक्स | बोरा. |
| पोथास | पोथास. | बोरासिक अॅसिड | बोरा-अॅसि. |
| प्यूलेक्स | प्यूले. | बोव्हिस्टा | बोव्हि. |
| प्रूनस स्पायनोसा | प्रून-स्पा. | ब्रायोनिआ | ब्रायो. |
| प्लॅटिनम | प्लॅटि. | ब्रोमिअम | ब्रोमि. |
| प्लॅन्टगो | प्लॅन्ट. | मर्क्युरिअस | मर्क्यु. |
| प्लंबम | प्लंबं. | मर्क्युरिअस— | |
| फेगोपायरम | फेगो. | आयोडेटम फ्लेव्हम | मर्क्यु-आ-फ्ले. |
| फार्मिका | फार्मि. | मर्क्युरिअस आयोडेटम रूब्रम | मर्क्यु-आ-रु. |
| फायटोलाका | फायटो. | मर्क्युरिअस कोरोझिव्हस | मर्क्यु-को. |
| फास्फरस | फास्फ. | मर्क्युरिअस डल्सिस | मर्क्यु-ड. |
| फास्फरिक अॅसिड | फास्फ-अॅसि. | मर्क्युरिअस सायानेटस | मर्क्यु-सा. |
| फिजास्टिग्मा | फिजास. | मॅग्नेसिआ कार्बोनिका | मॅग-का. |
| फेरम मेटॅलिकम | फेरम; मे. | मॅग्नेसिआ फास्फरिका | मॅग-फा. |

| संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप | संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप |
|---|---|---|---|
| मॅग्नेसिआ मूरिआटिका | मग्ने-मू. | ऱ्हसटाक्सीकोडेन्ड्रान | ऱ्हस-टा. |
| मॅग्नेटिस पोलस आस्ट्रॅलिस | मॅग्न-पो-आस्ट्रे | ऱ्हस रॅडिकन्स | ऱ्हस-रॅ. |
| मॅन्गॉनम | मॅन्गॉन. | ऱ्हस व्हेनिनेटा | ऱ्हेस-व्हे. |
| मॅन्सिनेला | मॅन्सि. | ऱ्हिअम | ऱ्हिअम. |
| मॅलान्ड्रिनम | मॅलान्ड्रि. | ऱ्होडोडेंड्रन | ऱ्होडो. |
| मायगेल | मायगे. | लॅक कॅनिनम | लॅक-कॅ. |
| मिरिका | मिरि. | लॅक डिफ्लोरेटम | लॅक-डि. |
| मिलिफालिअम | मिलि. | लॅकेसिस | लॅके. |
| मेझेरिअम | मेझे. | लॅक्टिक ॲसिड | लॅक्टि-ॲसि. |
| मेडोऱ्हिनम | मेडो. | लॅक्नॅन्थस | लॅक्नॅन. |
| मेनिआन्थिस | मेनि. | लॅट्रोडेक्टस | लॅट्रो. |
| मेरम व्हेरम | मेरम. | लॅथिरस | लॅथि. |
| मेलिलोटस | मेलि. | लाप्पा | लाप्पा. |
| मोस्कस | मोस्क. | लायकोपस | लायकोप. |
| म्युरिआटिक ॲसिड | म्युरि-असि. | लायकोपोडिअम | लायको. |
| म्युरेक्स | म्युरेक्स. | लायसिन | लायसि. |
| युआनिअम | युआनि. | लारोसरेसस | लारो. |
| युपेटोरिअम फरफॉलिएटम | युपे-पर. | लिथिअम कार्बोनिकम | लिथि-का. |
| युपेटोरिअम पुरपूरिअम | युपे-पुर. | लिलिअम टिग्रिनम | लिलि-टि. |
| युफोरबिअम | युफोर. | लेडम | लेडम. |
| युफ्रेसिआ | युफ्रे. | लेप्टांड्रा | लेप्टां. |
| युरेनिअम नायट्रिकम | युरे-ना. | लोबेलिआ | लोबे. |
| रॅटॅन्हिआ | रॅटनि. | लोलिअम टेम्युलेन्टम | लोलि-टे. |
| रॅननकुलस बल्बोसस | रॅनन-ब. | व्हर्बस्कम | व्हर्ब. |
| रॅननकुलस स्क्लिरेटस | रॅनन-स्क्लि. | व्हॅक्सिनिनम | व्हॅक्सि. |
| रॅफेनस | रॅफे. | व्हॅलेरिअन | व्हॅले. |
| रुमेक्स | रुमे. | व्हायपेरा | व्हायपे. |
| रुटा | रुटा. | व्हायोला ओडोरेटा | व्हाओ-ओ. |
| रेडिअम | रेडि. | व्हायोला ट्रायकलर | व्हाओ-ट्रा. |
| रोबिनिया | रोबि. | व्हिन्का मायनर | व्हिन्का. |

| संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप | संपूर्ण नाव | संक्षिप्त रूप |
|---|---|---|---|
| व्हिबुरनम | व्हिबु. | सिकोना | सिको. |
| व्हिस्कम आल्बम | व्हिस्क. | सिफायटम | सिफाय. |
| व्हेराट्रम आल्बम | व्हेरा-आ. | सेड्रन | सेड्र. |
| व्हेराट्रम व्हिराईड | व्हेरा-व्हि. | सेनेगा | सेनेगा. |
| व्हेरिओलिनम | व्हेरिओ. | सेनेसिओ | सेनेसि. |
| सल्फर | सल्फ. | सेपा | सेपा. |
| सल्फर आयोडेटम | सल्फ-आयो. | सेपिआ | सेपि. |
| सल्फुरिक ॲसिड | सल्फु-ॲसि. | सेलेनिअम | सेले. |
| संबूल | संबूल. | सोरिनम | सोरि. |
| सॅनिकुला | सॅनिकु. | स्टॅनम | स्टॅनम. |
| सॅन्गिवनेरिआ | सॅन्गिव. | स्टॅफिसॅग्रिआ | स्टॅफि. |
| सॅम्बुकस | सॅम्बुक. | स्टिक्टा | स्टिक्टा. |
| साबाडिल्ला | साबा. | स्टिलिंजिआ | स्टिलि. |
| साबाल | साबाल. | स्ट्रमोनिअम | स्ट्रमो. |
| साबिना | साबि. | स्ट्रांशिअम कार्बोनिका | स्ट्रांशि. |
| सार्सापरिला | सार्सा. | स्ट्रिक्निनम | स्ट्रिक्नि. |
| सालिडेगो | सालिडे. | स्ट्रोफॅन्थस | स्ट्रोफॅन्थ. |
| सिआनोथस | सिआनो. | स्पायजेलिआ | स्पायजे. |
| सिकुटा | सिकुटा. | स्पांजिआ | स्पांजि. |
| सिकेल | सिकेल. | हॅमॅमेलिस | हॅमॅमे. |
| सिक्लामेन | सिक्ला. | हायासायामस | हायासा. |
| सिना | सिना. | हेपार सल्फुरिस कॅल्करिआ | हेपार. |
| सिनापिस | सिनापि. | हेलेबोरस | हेलेबो. |
| सिनाबारिस | सिनाबा. | हेलोडर्मा | हेलोड. |
| सिफिलिनम | सिफि. | हेलोनिआस | हेलोनि. |
| सिमिसीफूजा | सिमिसि. | हैड्रास्टिस | हैड्रास्टि. |
| सिलिसिआ | सिलि. | हैड्रोकोटाईल | हैड्रोको. |
| सिल्ला | सिल्ला. | हैड्रोसायानिक ॲसिड | हैड्रोसा-ॲसि. |
| सिस्टस | सिस्ट. | हैपरिकम | हैपरि. |

# भावनाकोश

## मानसिक विकार

**बुद्धि** :– अको; अनाका; आरम-मे; इग्ने; *ओपि*; कॅनॅबि; कोक्यु; नक्स-व्हा; नेट्र-का; पल्स; प्लॅटि; *फास्फ*; *फास्फ-ॲसि*; बॅप्टि; *बॅरि-का*; बेला; मर्क्यु; न्हस-टा; लॅके; *लायको*; लारो; *व्हेरा-आ*; सल्फ; *सेपि*; *स्ट्रमो*; *हायासा*; हेलेबो.

**मन** :– अको; आरम-मे; आर्से; इग्ने; ओपि; कॅल्क-का; कामो; *नक्स-व्हा*; नेट्र-का; नेट्र-मूर; *पल्स*; प्लॅटि; फास्फ; फास्फ-ॲसि; *बेला*; ब्रायो; लॅके; लायको; लिलि-टि; व्हॅलेरि; व्हेरा-आ; सल्फ; सिको; सेपि; *स्ट्रमो*; *हायासा*.

**उलट, सुलट मनोवृत्ति**:–अल्युमि; आयो; आरम-मे; *इग्ने*; कोनि; क्रोक; झिंक; *नक्स-मो*; प्लॅटि; फेरम; बेला; बोव्हि; लायको; व्हॅलेरि; व्हेरा-आ; सार्सा; सल्फु-ॲसि; सेपि; स्ट्रमो.

भावना व शारीरिक:– साबा.

मानसिक व शारीरिक:– आर्नि; क्रोक; इग्ने; प्लॅटि; म्युरे; लिलि-टि; सिमिसि.

**तीक्ष्ण, कुशाग्र**:– *ओपि*; *कॉफि*.

**अक्कडबाज** :– स्ट्रमो.

**अकारण दुःखी** :– (आपणास काहीतरी होत आहे असे वाटून):– *आरम-मे*; आर्से; इग्ने; कोनि; *नक्स-व्हा*; नेट्र-का; नेट्र-मूर; *पल्स*; प्लॅटि; व्हॅलेरि; सल्फ; सेपि; स्टॅनम.

**वषयिक कारणामुळे** :– मोस्क.

**अकाली प्रौढत्व** :– मर्क्यु; लायको.

**अघोर गोष्टी करण्याची प्रवृत्ती**:– अल्युमि; आयो; आर्से; कास्टि; मर्क्यु; लॅके; हेपार.

**अचानक, अकस्मात एखादी गोष्ट करणे** :– **टरेन्टु**; नेट्र-मूर; प्लॅटि.
**अजागळ** ( घाणेरडा, अव्यवस्थित वागणूक ) :– अमो-का; कलि-बाय; **कॅप्सि**; केलि; **ग्रफाय**; नक्स-व्हा; फास्फ; बोरा; **मर्क्यु**; लॅके; **सल्फ**; सेपि; सोरि.
**अडाणी** ( गांवढळपणा ) :– कॅप्सि; बॅरि-का.
**अतिरेक करणे** :– कास्टि; कोनि; बेला; व्हॅलेरि.
**अद्‌भुत गोष्टींचे ज्ञान** :– अंतर्ज्ञानी पहा.
**अधार्मिक** :– अनाका; कलि-ब्रो; लारो.
**अधीर** :– उतावीळ पहा.
**अनवधान** :– चित्त जागेवर नसणे पहा.
**अनपेक्षित** :– इग्ने.
**अनादर** ( पवित्र गोष्टींविषयी ) :– अश्रद्धा पहा.
**अनिश्चितपणा** ( धरसोड ):– **आर्से**; ओनास्मा; ओपि; **इग्ने**; **नक्स-मो**; ***पल्स***; बॅरि-का; लॅके; लायको; हेलेबो.
**अपमान** ( मानभंग ) :– आर्से; कॅल्क-फा; कोलो; **स्टॅफि**.
**अपराधी आहोत** असे वाटणे :– पश्चात्ताप पहा.
**अबोला** (मौन):–आरम-मे; आर्से; **इग्ने**; कलि-मू; कार्बो-अनि; कोक्यु; ग्लोनो; ***झिंक***; थूजा; **पल्स**; प्लंबं; प्लॅटि; फास्फ; ***फास्फ-ॲसि***; **बेला**; ब्रायो; ***म्युरि-ॲसि***; **व्हेरा-आ**; सल्फ; स्टॅनम; हेलेबो.
**व भांडखोरपणा,** आलटून पालटून :– कोनि.
**अयशस्वी** आहोत असे वाटणे :– नाजा; सल्फ.
**अविश्वास** :– संशयी पहा.
**अव्यवस्थित, वागणूक** ( अजागळ पहा ) :– सल्फ.
**अशिष्ट** ( वागणूक ) :– **कामो**; **नक्स-व्हा**; बुफो; ब्रायो; सिना.
**अश्रद्धा** :– ***अनाका***; टरेन्टु; नाय-ॲसि, लायको; लिलि-टि; व्हेरा-आ; स्ट्रमो.
**अश्लील** :– वैषयिक वृत्ति पहा.
**असमाधान** ( असंतुष्ट ) :– अनाका; कल्क-फा; कामो; क्रिआसो; टयुब; नेट्र-मूर; ***पल्स***; **बिस्मथ**; मर्क्यु; रुटा; **सल्फ**.
**प्रत्येक गोष्टीविषयी** :– क्रिआसो; **नेट्र-मूर**.
**मनात, आतल्या आत** :– आरम-मे; इग्ने; इपि; नेट्र-मू; स्टॅफि.
**रडण्याने** ब वा :– नाय-ॲसि.
**असहनशील** :– ॲन्टि-क्रू; ॲन्टि-टा; कामो; सॅनिकु; सिमि; हेपार.
**असंबद्ध** :– बेभान पहा.

**अस्ताव्यस्त** :– स्ट्रमो.
**अस्वस्थ** ( बेचैन ) :– आयो; ***आर्से***; कलि-आर्से; कलि-का; **कॅल्क-का**; **टरेन्टु**;
नेट्र-का; फास्फ; मर्क्यु; सिमिसि.
**एके ठिकाणी चैन पडत नाही :– *आर्से*.**
**निजल्याने ब वा** :– मॅन्गॅनं.
**अहंपणा** :– आत्मप्रौढी पहा.
**अंकित** आहोत बलिष्ठ शक्तीच्या असे वाटते :– अनाका; ओपि; थूजा; **नाजा**;
**प्लॅटि**; **लॅके**.
रहावेसे वाटते :– कॅल्क-का; **फास्फ**, लॅके; **सिलि**.
**अंतर्मुख** ( अंतर्दृष्टि ) :– **इग्ने**, ओलि-अनि, **कोक्यु**, **पल्स**; म्युरि-ॲसि.
**अंतर्ज्ञानी** :– अको; ओपि; नक्स-मो; फास्फ; लायसि; मेडो.
**अंथरुणातच राहावेसे वाटते** :– आर्जे-ना; हायासा.
**अंधारात चाचपडल्या**सारखे वाटते :– ओपि; क्रोक; प्लंबं; हायासा.
**आकलन**, उशीरा, सावकाश :– अनाका; आर्से; फास्फ; बॅरिका.
**होत नाही** :– भान पहा.
**आकस दुष्ट बुद्धि** :– ***अनाका***; **कामो**; कुप्रं; टरेन्टु; ***नक्स-व्हा***; नाय-ॲसि;
नेट्र-मू; लायको; स्ट्रमो.
**आग लावावीशी वाटते** :– हेपार
**आजारी असून**सुद्धा बरे आहोत असे म्हणणे :– आयो; ***आर्नि***; आर्से; **एपि**;
ओपि; कॅनॅबि; काफि.
**आठवण** एकदम नाहीशी होते वेदनामुळे वगैरे :– स्मरणशक्ती पहा.
**आठवणी** नापसंत मनात येतात :– अमो-का; ॲम्ब्रा; कॅल्क-का; कामो; थूजा;
नाय-ॲसि; **नेट्र-मूर**; फास्फ; **लायको**; सल्फ; सेपि; सोरि; हायासा;
हेपार.
**आनंदी** :– अको; **ओपि**; कॅनॅबि; ***कॉफि***; ***क्रोक***; नेट्र-का; लॅके; हायासा.
**डोके दुखत असताना :– थेरि.**
नंतर :– फार्मि.
**दुसऱ्याना दुःखात पाहिल्याने** :– आर्से.
**व उदास, आलटून पालटुन** :– सेनेसि.
**विटाळशी होण्याचे अगोदर** :– कोका; फुओ-असि.
पणात :– फुओ-ॲसि.
**वेदना** होताना :– स्पायजे.

**आत्मकेंद्रित** :– सेनेसि.

**आत्मप्रौढी** (आत्मश्लाघा) :– कुप्रम; **प्लॅटि**; फास्फ; बेला; **लायको**; व्हेरा-आ.

**आत्मविश्वासाचा** अभाव :– अनाका; आर्जे-नाय; आर्से; पिक्रि-ॲसि; लायको; सिलि.

**आत्महत्येचा विचार** ( जगण्याचा कंटाळा ) :– ॲन्टी-क्रू; ***आरम-मे***; ***आर्से***; टचूर्ब; ड्रोसे; थूजा; **नक्स-व्हा**; नाय-ॲसि; नाजा; नेट्र-मूर; **नेट्र-स**; पल्स; **फास्फ**; मर्क्यू; लॅके; सिको; सोरि.

**उपाशी राहून** :– मर्क्यु.

**उंचावरून उडी मारून** :– आर्जे-ना; आयो; गेल्से; लॅके.

**गाडीखाली** :– कलि--ब्रो.

**घराच्या ओढीमुळे** :– कॅप्सि.

**पिस्तुलाने** :– अनाका; ॲन्टि-क्रू, **नेट्र-स.**

**फाशी घेऊन** :– आर्से; बेला.

**बुडून** :– ड्रोसे; न्हस-टा; सिकेल; हायासा.

**रडण्याने ब वा** :– फास्फ; मर्क्यु.

**विटाळसेपणी** :– मर्क्यु.

**वेदनामुळे** :– **आरम-मे**; नक्स-व्हा.

**संगीत, गाणे ऐकल्यानंतर**:– नेट्र-का.

**आपली स्तुति** लोकांनी करावी अशी इच्छा :– पालाडि.

**आपण दोन आहोत**, दुसरेच कोणीतरी आहोत, शरीराचे भाग वेगवेगळे झाले आहेत असा भास :– **अनाका**; आर्जे-नाय; कॅनॅबि; **गेल्से**; झॅन्थो; ट्रिलि; थूजा; थेरि; नक्स-मो; पायरो; ***पेट्रो***; ***फास्फ***; ***बॅप्टि***; लॅके; **लिलि-टि**; व्हॅलेरि; सिलि; **स्ट्रमो.**

**आभास** :– भ्रम, भ्रामक कल्पना पहा.

**आवाजासंबंधी** :– अको; क्लोरल-हैड्र; स्ट्रमो.

**स्पर्शेंद्रियासंबंधी** :– अनाका; **ओपि**; कॅन्था; थूजा; न्हस-टा; स्ट्रमो.

**आयुष्यात नालायक आहोत** असे वाटते :– नेट्र-स; प्लॅटि; सेपि.

**आरडाओरड** :– अको; कामो; **बेला**; सिकुटा.

**आलिंगन** देण्याची प्रवृत्ति :– अगारि; प्लॅटि.

**आव्हान देणे** :– आर्नि; लायको.

**आशाभंग** :– अल्युमि; नेट्र-मू.

**त्यामुळे काही करावेसे वाटत** नाही :– नक्स-व्हा.

